प्रकल्पग्रस्त अथवा त्यांच्यावर अवलंबून असणाऱ्या व्यक्ती यांना शासकीय सेवेतील गट-क आणि गट-ड मधील पदांवर सर्वोच्च प्राधान्यक्रमानुसार नियुक्ती देण्यासंबंधीच्या आदेशांची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्याबाबत ...

**महाराष्ट्र शासन**

सामान्य प्रशासन विभाग

**शासन परिपत्रक क्र. :प्रकल्प-१००२/मु.स.१४२/प्र.क्र.२४/२००२/१६-अ,**

मंत्रालय,मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- २ ऑगस्ट,२००२

**संदर्भ :-** १) शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग, क्र.:एईएम-१०८०/३५/१६-अ, दि.२१.१.८०

२) शासन परिपत्रक,महसूल व वन विभाग,क्र.आरपीए-१०९३/प्र.क्र.१२९/र-१, दि.२२ सप्टेंबर,१९९३.

३) शासन निर्णय,सा.प्र.वि.क्र.:एसआरव्ही-१०९४/१००४/प्र.क्र.३०/१६-अ,दि.१७.११.९४

४) शासन परिपत्रक,सा.प्र.वि.,क्र. :प्रानिमं-१२९६/प्र.क्र.१४९/९६/१३-अ, दि.२.१.१९९७.

५) शासन परिपत्रक सा.प्र.वि.क्र.:प्रकल्प-१०००/प्र.क्र.२७/२०००/१६-अ,दि.१३.९.२०००.

६) शासन परिपत्रक सा.प्र.वि.क्र.:प्रकल्प-१००१/१०९/प्र.क्र.१३/०१/१६-अ,दि.७.४.२००१.

७) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : असंक-१००१/प्र.क्र.२१/२००१/वित्तीय सुधारणा, दि.१०.९.२००१.

८) शासन परिपत्रक सा.प्र.वि.क्र.:प्रकल्प-१००२/मु.स.१४२/प्र.क्र.२४/२००२/१६-अ, दि.२०.३.२००२.

**शासन परिपत्रक**

प्रकल्पग्रस्त अथवा त्यांच्यावर अवलंबून असणाऱ्या व्यक्ती यांना शासकीय सेवेतील गट-क आणि गट-ड मधील पदांवर सर्वोच्च प्राधान्यक्रमानुसार नियुक्ती देण्यासंबंधीच्या आदेशांची प्रभावीपणे अंमलबजावणी करण्याच्या संदर्भात उपरोल्लेखित दि.२०/३/२००२ च्या शासन परिपत्रकान्वये सूचना देण्यात आल्या होत्या. आता सदर परिपत्रक रद्द करून पुढील सुधारित सूचना देण्यात येत आहेत.

२. शासनाने प्रकल्पग्रस्तांनी विविध प्रकल्पासाठी शेतजमिन, घर, इत्यादिबाबत केलेला त्याग विचारात घेऊन शासकीय सेवा, शासन पुरस्कृत महामंडळे, जिल्हा परिषदा, महानगरपालिका, नगरपालिका व ज्यांना मार्गदर्शक आदेश देण्याचा अधिकार शासनाला आहे, अशा सेवा व संस्था यांच्या आस्थापनेतील सेवांमध्ये प्रकल्पग्रस्तांना नियुक्त्यांमध्ये सर्वोच्च प्राधान्य दिले आहे. या परिपत्रकाद्वारे सर्व नियुक्ती प्राधिकाऱ्यांना सूचना देण्यात येत आहेत की, प्रकल्पग्रस्तांसाठी विहित करण्यात आलेल्या सर्वोच्च प्राधान्य क्रमानुसार प्रकल्पग्रस्तांना नियुक्त्या देण्याच्या धोरणाची प्रभावीपणे अंमलबजावणी होण्याच्या दृष्टिने दक्षता घेण्यात यावी. तथापि वित्त विभागाने पदनिर्मिती, पदभरती व पदांचे पुनरुज्जीवन याबाबतचे निर्बंध व अनुषंगीक

आढावे आणि अतिरिक्त संवर्ग योजनांतर्गत कक्षाची स्थापना व त्याचे व्यवस्थापन या संबंधात शासन निर्णय दि.१०/९/२००१ अन्वये विहित केलेल्या सूचनांनुसार प्रत्येक विभागाने त्यांच्या आस्थापनेवरील पदांच्या आढाव्याबाबत कार्यवाही पूर्ण करून त्या संबंधीचा प्रस्ताव मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय सचिव समितीस सादर करण्यासाठी वित्त विभागाकडे पाठवावयाचा असल्याने व या आढाव्यानुसार पद रिक्त असले तरीही मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील उच्चस्तरीय सचिव समितीने पदे भरण्यास मान्यता दिल्याशिवाय पदे भरावयाची नसल्याने वित्त विभागाच्या उक्त परिपत्रकातील परिच्छेद ३.६ मध्ये नमूद केल्यानुसार अशी मान्यता मिळाल्याशिवाय प्रकल्पग्रस्तांच्या नियुक्त्या करु नयेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( व. शा. देशपांडे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

१) राज्यपालांचे सचिव,
२) मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
३) उप मुख्यमंत्र्यांचे सचिव.
४) सर्व मंत्री /राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
५) मुख्य सचिव.
६) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव.
* ७) प्रबंधक,उच्च न्यायालय,मूळ न्याय शाखा,मुंबई.
* ८) प्रबंधक,उच्च न्यायालय,अपिल शाखा,मुंबई.
* ९) प्रबंधक,महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण,मुंबई.
* १०) प्रबंधक,लोक आयुक्त व उप लोक आयुक्त,मुंबई.
* ११)सचिव,महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई.
* १२) सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन,मुंबई.
* १३) सचिव,राज्य निवडणूक आयोग,मुंबई.
१४) सर्व विभागीय आयुक्त,
१५) सर्व जिल्हाधिकारी/ जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१६) संचालक ,समाजकल्याण पुणे.
१७) आयुक्त,आदिवासी विकास ,नाशिक.
१८) संचालक,आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था पुणे.
१९) संचालक,सेवायोजन,मुंबई
२०) सहायक आयुक्त, (मागासवर्ग कक्ष),सर्व विभागीय आयुक्तांची कार्यालये.
२१) मंत्रालयीन विभागाच्या अधिपत्याखालील सर्व विभाग / कार्यालय प्रमुख.
२३) सर्व मंत्रालयीन विभाग.
२४) सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने.
२५) निवड नस्ती.

* (पत्राने)